शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथील रुग्णालयीन व विद्यार्थी वसतीगृहाचे दुरुस्ती व विद्युत विषयक कामांच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएम-२०२४/प्र.क्र.५०२/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०२४

वाचा : आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/ मिरज/ वसतिगृह व गौण बांधकामे १३ अंदाजपत्रके/११३८८/आय-प/२४, दि.१८.०७.२०२४

शासन निर्णय :

विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथे रुग्णालयीन व विद्यार्थी वसतीगृहाची दुरुस्ती व विद्युत विषयक कामे करण्यासाठी रुपये १७,४५,८९,४३९/- (रुपये सतरा कोटी, पंचेचाळीस लक्ष, एकोणनव्वद हजार, चारशे एकोणचाळीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १ | Repairs to IPD Building at Government Medical College and Hospital at Miraj (Repairs to Toilet Block & other Misc Works) | २,५०,००,००० |
| २ | CR to OPD Building at Government Medical College and Hospital at Miraj (Repairs to Toilet Block & other Misc Works) | २,५०,००,००० |
| ३ | Repairs to Boys Hostel at Government Medical College and Hospital at Miraj (Repairs to Toilet Block & other Misc Works) | २,४५,००,००० |
| ४ | Construction of Compound Wall at Government Medical College and Hospital, Miraj Tal-Miraj, Dist-Sangli | २,४९,६९,००० |
| ५ | Construction of BT Road in Residential & Non Residential Campus in Government Medical College and Hospital at Miraj | २,००,००,००० |
| ६ | Repairs to Type-IV Quarters at Government Medical College and Hospital, Miraj Tal-Miraj, Dist-Sangli (Repairs to Toilet Block & other misc works in Building No.1,2) | १,६०,००,००० |
| ७ | Repairs to Type-IV Quarters at Government Medical College and Hospital, Miraj Tal-Miraj, Dist-Sangli (Repairs to Toilet Block & other misc works in Building No.3,4) | १,६०,००,००० |
| | एकूण (स्थापत्य विषयक कामे) (अ) | **१५,१४,६९,०००** |
| ८ | Providing Renovation to EI and Switchgear of IPD and OPD Building at GMCH, Miraj, Dist-Sangli | ८९,५०,८१४ |
| ९ | Providing Replacement of Old Street Light in the premises of Hospital, IHR Hostel, Girls and Boys Hostel at GMCH Miraj, Dist-Sangli | १९,६६,५८६ |
| १० | Providing Replacement of Old Spilt type AC unit, Centralize AC Plate Compressor and related Accessories at GMCH Miraj, Dist-Sangli | ३८,२५,२५० |

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| ११ | Providing 20 passenger cum stretcher lift to OPD Building at GMCH Miraj, Dist-Sangli | २७,०४,९०१ |
| १२ | Providing 250 KVA DG Set 2 Nos at GMCH Miraj, Dist-Sangli | ५६,७२,८८८ |
| विद्युत विषयक कामे (ब) | | **२,३१,२०,४३९** |
| एकूण अ+ब | | **१७,४५,८९,४३९** |

अटी :-

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

६) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०८१४३१३८१६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.08.08 16:29:18 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मिरज
६. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
८. निवडनस्ती (प्रशा-१).